आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(लेखाशिर्ष २८०१ ५६१४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र. ९/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.०३.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.९/कार्या-६, दि.१२.१०.२०२२ व दि.३१.०१.२०२३.
३) ऊर्जा विभाग, नस्ती क्र.पूरमा-२०२२/प्र.क्र. १३६/ऊर्जा-३.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊर्जा विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींमधून महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.४९४२.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २८०१, वीज या मुख्य लेखाशीर्षाखाली अनुसूचित जमाती घटकाकरीता कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.४९४२.०० लाख इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज** | **यापूर्वी वितरीत निधी** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत | २८०१ ५६१४ | ३३, अर्थसहाय्य | २४९४२.०० | १६०००.०० | ४९४२.०० |
| **एकूण** | | | **२४९४२.००** | **१६०००.००** | **४९४२.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.४९४२.०० कोटी (अक्षरी रुपये एकोणपन्नास कोटी बेचाळीस लाख फक्त) इतका निधी प्रशासकिय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४११-२०२३/व्यय-१४, दि.२९.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१४३००७४३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.03.31 12:33:20 +05'30'

(राजेंद्र दे. भवारी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.